नाटयनिर्मिती संस्थांना नवीन नाट्य निर्मितीसाठी अनुदान योजना प्रयोग अनुदान मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्र. नासंअ ४८२५/प्र.क्र.९६(ई.नं.९८५७०५)/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२५

**संदर्भ :-** पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्र. नासंअ ४८२५/ प्र.क्र.९६(ई.नं.९८५७०५)/सां.का.४, दि. ११ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :-**

नाट्य निर्मिती संस्थांना नवीन नाटकांच्या निर्मितीसाठी अनुदान मंजूर करण्याची नियमावली उपर्निर्दिष्ट क्र.१ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार गठीत करण्यात आलेल्या नाट्य परिक्षण समितीमार्फत परीक्षण करून नाटकाचा दर्जा ठरविला जातो. प्रस्तुत प्रकरणी झालेल्या परीक्षणाअंती दर्जा प्राप्त नाटकांना विहीत प्रयोगांसाठी अनुदान मंजूर केले जाते. नाट्य परीक्षण समितीमार्फत दर्जा प्राप्त ठरलेल्या नाटकांना विषयांकित नियमावलीत विहीत केलेल्या प्रयोग संख्येच्या टप्प्यानुसार अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"नाट्यनिर्मिती संस्थांना नवीन नाट्य निर्मितीसाठी अनुदान" या योजनेंतर्गत खालील नाट्य संस्थेच्या दर्जा प्राप्त नाटकांस त्यांच्या समोरील रकान्यातील एकूण झालेल्या प्रयोगासाठी प्रति प्रयोग अनुदानाप्रमाणे एकूण रुपये २७,७५,०००/- (रूपये सत्तावीस लाख पंच्याहत्तार हजार फक्त) इतके अनुदान या शासन निर्णयान्वये मंजुर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | संस्थेचे नाव | नाटकाचे नाव | नाटकाचा दर्जा | एकूण प्रयोग | प्रति प्रयोगासाठी अनुदान | एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | अष्टविनायक | **मर्डरवाले कुलकर्णी** (व्यावसायिक) | अ | १०-पहिला टप्पा | २५,०००/- | २,५०,०००/- |
| | | | | २५-दुसरा टप्पा | २५,०००/- | ६,२५,०००/- |
| | | | | ४०-तिसरा टप्पा | २५,०००/- | १०,००,०००/- |
| | | | | १६-चौथा टप्पा | २५,०००/- | ४,००,०००/- |
| २ | सवाई गंधर्व एंटरटेनमेंट | **फ्रेन्ड रिक्वेस्ट** (व्यावसायिक) | अ | १०-पहिला टप्पा | २५,०००/- | २,५०,०००/- |
| ३ | स्वेवन स्टुडिओज आर्ट | **जन्मवारी** (व्यावसायिक) | अ | १०-पहिला टप्पा | २५,०००/- | २,५०,०००/- |
| | | | | | **एकूण रुपये** | **२७,७५,०००/-** |

०२. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येईल. तसेच, सदरील खर्च हा बिनशर्त स्वरूपाचा आहे.

०३. या योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.झेड डी-२, २२०५, कला व सांस्कृतिक संस्था, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना- कला व सांस्कृतिक संस्था - (०५) कला व सांस्कृतिक संस्थांना सहाय्यक अनुदान (०५) (०१) कला व सांस्कृतिक कार्य संस्थांना सहाय्यक अनुदान (२२०५ १६२३) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ व १२ फेब्रुवारी, २०२५ मधील सर्व परिच्छेद परीशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३३१२२०६२०८५२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BALASAHEB
ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.31 22:06:51 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.४ ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र , मुंबई
११.महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२.निवड नस्ती, सां.का.४